पुसद पंचायत समिती (जिल्हा यवतमाळ) नविन प्रशासकीय
इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.११६/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ३१ ऑगस्ट,२००९

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,यवतमाळ यांचे पत्र क्र.यजिप/बांध-२/ता.२/८३०/ ०९,
दिनांक- २८.७.२००९

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी संदर्भीय दिनांक २८.७.२००९ च्या पत्रान्वये पुसद पंचायत समितीची प्रशासकीय इमारत अतिशय जीर्ण झालेली व मोडकळीस आलेली असल्याने सदर इमारत पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. पुसद पचांयत समितीची अस्तित्वात असलेली इमारत सन १९५९ साली बांधण्यात आलेली असून, सदर इमारत अतिशय जीर्ण झालेली असल्याबाबतचे प्रमाणपत्र उपअभियंता,(बांध),जि.प.,पुसद यांनी सादर केले आहे. नविन इमारत बांधकामाकरीता पंचायत समितीच्या मालकीची जागा उपलब्ध असून, त्याबाबतचा सात-बारा उतारा प्रस्तावासोबत जोडण्यात आला आहे. नविन इमारत बांधकामाबाबत पुसद पंचायत समितीने दिनांक १.२.२००८ रोजी ठराव पारित केला आहे. प्रस्तावित इमारत बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्र, सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील टी/एडीएम/५५११ हा नमुना नकाशा वापरण्यात आला आहे. याकरीता शासन सूचनांनुसार विहीत केलेले १०२६.५६ चौ.मी. क्षेत्रफळ विचारात घेण्यात आले आहे. प्रस्तावित बांधकामाकरीता रु.१,५०,२७,२०७/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत असून, ते उप अभियंता, जि.प.उपविभाग, पुसद व कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., यवतमाळ यांनी सांक्षाकिंत केले आहे. अति.मुख्य कार्यकारी जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी प्रस्तावासोबत बांधकामाचा नकाशा, जुन्या इमारतीचा ले- आऊट प्लॅन, लीड चार्ट व मालमत्तेच्या रजिस्टर कार्डातील उतारा इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, पुसद पंचायत समितीच्या रु.१,५०,२७,०००/- इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या नविन इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

पुसद (जिल्हा-यवतमाळ ) पंचायत समितीची अस्तित्वातील मोडकळीस आलेली इमारत पाडून, त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये-१,५०,२७,०००/- (रुपये एक कोटी पंन्नास लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित पुसद पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि. मुंबई यांच्याकडील नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.

(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२.	पुसद पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| **Sr.** | **Work Details** | **Amount** |
| 1 | Construction Cost of Admn. Bldg. | 11471150.00 |
| 2 | Add 11% For Electrification charge | 1261827.00 |
| 3 | Add 8 % For External water supply & Sanitation charges | 917692.00 |
| 4 | Add 4 % For Contingencies charges | 458846.00 |
| 5 | Add 2 % For Computerization charges | 229423.00 |
| 6 | Add 6 % For Escalation charges | 688269.00 |
| | Total Rs. | 15027207.00 |
| | Say | Rs. 1,50,27,000/- |

३.	उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

४.	यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५.	सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०८३११७४०१०००१. असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त अमरावती विभाग, अमरावती.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यवतमाळ
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यवतमाळ
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद यवतमाळ
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा यवतमाळ
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा यवतमाळ विभाग, यवतमाळ
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, यवतमाळ
१०) सभापती, पंचायत समिती, पुसद, जिल्हा यवतमाळ
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पुसद, जिल्हा यवतमाळ
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई